20110729113041001

प्रादेशिक योजना पुणे
मौजे न-हे येथील जमिनीचा
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना
अधिनियम१९६६चे कलम
२०(४)अन्वयेफेरबदल करणेबाबत.
स.नं १३ (पै).

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक टिपीएस - १८०८/३७१/प्र.क्र.२०८५/२०१०/नवि-१३
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,
दिनांक : २६.०७.२०११.

**शासन निर्णय :-** सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द करावी.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुनिल मरळे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
जिल्हाधिकारी, पुणे.
सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे
(त्यांना विनंती की, अनुषंगाने अधिप्रमाणीत करावयाचे भाग नकाशे ५ प्रतीत पाठविण्यांत यावेत)
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिद्ध करून त्याच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांना पाठवाव्यात)
कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदरहू अधिसूचना या विभागाच्या www.urban .maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिद्ध करावी.
निवडनस्ती (नवि-१३)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :-२६/०७/२०११.**

**अधिसूचना**

**महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना, अधिनियम १९६६**

क्रमांक : टिपीएस १८०८/३७१/प्रक्र.२०८५/१०/नवि-१३

ज्याअर्थी, पुणे जिल्हयाची प्रादेशिक योजना (यापुढे जिचा उल्लेख "उक्त प्रादेशिक योजना" असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र शासनाच्या नगरविकास विभागाकडील अधिसूचना क्र.टिपीएस-१८९५/२२७/ प्र.क्र.२६/१५/नवि-१३, दिनांक २५ नोव्हेंबर १९९७ (यापुढे जिचा उल्लेख "उक्त अधिसूचना" असा करण्यात आला आहे) अन्वये महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या कलम १५ (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त अधिनियम" असा करण्यात आलेला आहे) अन्वये मंजूर केली असून ती दिनांक १० फेब्रुवारी १९९८ पासून अंमलात आलेली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त प्रादेशिक योजनेतील प्रस्तावानुसार मौजे न-हे येथील स.नं.१३(पै) व मौजे आंबेगाव (खु.) येथील स.नं.१००(पै), ता.हवेली, जि.पुणे ह्या जमिनी शेती तथा नाविकास विभागात समाविष्ट आहे. (यापुढे "उक्त जमिनी" असा उल्लेख करण्यात आला आहे);

आणि ज्याअर्थी, सचिव, महर्षी कर्वे स्त्री शिक्षण संस्था यांनी उक्त जमिनी शेती तथा नाविकास विभागातून वगळून शैक्षणिक कारणासाठी सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करण्याची विनंती शासनाला केली आहे;

आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त अधिनियम" असा करण्यात आला आहे) चे कलम २० पोटकलम (२) मधील तरतूदीनुसार काही अटींवर उक्त जमीनींपैकी केवळ मौजे नऱ्हे येथील सर्वे न. १३ (पैकी) जमिन शेती तथा नाविकास विभागातून वगळून सार्वजनिक/ निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करणे (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त फेरबदल" असा करण्यात आला आहे) उचित होईल, असे शासनाचे मत आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम २० पोट-कलम (३) मधील तरतूदीप्रमाणे उक्त जमिनींपैकी केवळ मौजे नऱ्हे येथील सर्वे न. १३ (पैकी) जमिन शेती तथा नाविकास विभागातून वगळून सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करण्यासाठी शासनाच्या नगर विकास विभागाने क्र.टिपीएस-१८०८/३७१/प्र.क्र.२०८५/२०१०/नवि-१३, दि.१३.७.२०१० अन्वये आम जनतेच्या हरकती/सूचना मागविण्यासाठीची नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्र भाग-१ पुणे विभाग पुरवणीत दि.१२.८.२०१० रोजी पृष्ठ क्र.३३३७ ते ३३३९ वर प्रसिद्ध केली आणि विहीत मुदतीत प्राप्त सूचना/हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल सादर करण्याकरिता अधिकारी म्हणून सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांची नियुक्ती करण्यात आली होती (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त अधिकारी" असा करण्यात आला आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिका-यांच्या प्राप्त अहवालावर संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त जमिनीपैकी केवळ मौजे न-हे येथील सर्व्हे नं १३ पैकी

जमीन अटीसापेक्ष शेती तथा नाविकास विभागातून वगळून सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे.

त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम २० चे पोटकलम (४) व त्यानुषंगाने प्राप्त अधिकारात शासन उक्त जमिनींपैकी मौजे नऱ्हे येथील सर्वे न. १३ (पैकी) जमिनीच्या उक्त फेरबदल प्रस्तावास अटीसापेक्ष पुढीलप्रमाणे मंजूरी देत आहे व त्यासाठी उक्त प्रादेशिक योजना मंजूरीच्या दि.२५ नोव्हेंबर १९८७ च्या अधिसूचनेतील फेरबदलांच्या अनुसूचीमध्ये शेवटच्या नोंदीनंतर पुढील नवीन नोंद समाविष्ट करण्यात येत आहे.

**नोंद**

" मौजे न-हे येथील स.नं.१३(पै) ता.हवेली, जि.पुणे ही जमिन नकाशात दर्शविल्याप्रमाणे शेती तथा नाविकास विभागातून वगळून खालील अटीसापेक्ष सार्वजनिक/निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करण्यात येत आहे."

**अटी :-**

अट क्र.१- आवश्यक मुलभूत सोई-सुविधा अर्जदार संस्थेने उपलब्ध करुन घेणे बंधनकारक राहील.

अट क्र.२- एकूण क्षेत्राच्या ४०% सलग क्षेत्र क्रिडांगणासाठी राखीव ठेवणे बंधणकारक आहे.

अट क्र.३- उक्त जागेस कमीत कमी १२ मी. रुंदीचा प्रवेश मार्ग आवश्यक राहील.

**टिप :-**

अ) उक्त फेरबदलाखालील जमिनी दर्शविणारा भाग नकाशा क्रमांक.टिपीएस १८०८/३७१/प्रक्र.२०८५/१०/ नवि-१३, नागरिकांच्या अवलोकनार्थ कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेत खालील कार्यालयात उपलब्ध राहील.

१) सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे २८३ नारायणपेठ, पुणे-४११०३०

२) जिल्हाधिकारी, पुणे.

ब) सदरहू सूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सुनील मरळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

# NOTIFICATION

## Government of Maharashtra

## URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,

Mantralaya, Mumbai -400 032

Dated: 26 July, 2011

**Maharashtra Regional & Town Planning Act, 1966**

No TPS 1808/371/CR 2085/10/UD-13

Whereas, the Government in Urban Development Department vide Notification No. TPS-1895/227/CR-26/95/UD-13, Dated 25th November 1997 has sanctioned the Regional Plan for Pune district (hereinafter referred to as 'the said Regional Plan') under section 15 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (hereinafter referred to as 'the said Act') so as to come into force with effect from 10th February 1998;

And whereas, as per the proposals of the said Regional Plan the lands bearing S.Nos.13(part) of village Narhe and S.No.100 (part) of Village Ambegaon (k) Taluka Haveli, District Pune are included in Agricultural & No Development zone (hereinafter referred to as 'the said lands') ;

And whereas, Secretary, Maharshi Karve Sthree Shikshan Sanstha requested Government to change the zone of the said land and include in Public / Semi-Public Zone; For Educational Purpose;

And whereas, Government of Maharashtra is of the opinion that out of the said lands bearing S.No.13 (part) of village Narhe shall be deleted from Agricultural / No Development Zone and proposed to be included in Public / Semi-Public Zone under sub section (2) of section 20 of the said Act, subject to conditions (hereinafter referred to as "the said modification");

And whereas, the notice regarding the said proposed modification under sub section (3) of the section 20 of the said Act bearing No.TPS-1808/371/CR-2085/2010/UD-13, dated-13.7.2010 was published and which is appeared in Maharashtra Government gazette, part-I, Pune Division supplement dated-12.8.2010 on pages 3337 to 3339 for inviting suggestion/ objections from general public and the Assistant Director of Town Planning, Pune, was appointed as an officer by the Government to hear suggestions/objections and submit his report to Government (hereinafter referred to as "the said officer") ;

And whereas, after considering the report submitted by the said Officer and consulting Director of Town Planning, Maharashtra State, Pune, Government is of the opinion that out

of the said lands bearing S.No.13 (part) of village Narhe shall be deleted from Agricultural / No Development Zone and to be included in Public / Semi-Public Zone with conditions;

Now therefore, in exercise of the powers conferred by sub section (4) of section 20 of the said Act the Government hereby finally sanction the said Modification proposal and for that purpose modifies the notification sanctioning the said Regional Plan as follows;

In the schedule of modifications appended to the notification dated- 25th Nov 1997 sanctioning the said Regional Plan after the last entry the new entry is added as following;

**ENTRY**

The land bearing S.Nos.13(part), of village Narhe Taluka Haveli, District Pune is deleted from Agricultural & No Development zone and included in Public / Semi-Public Zone as shown on plan subject to following conditions;

**Conditions** :-

1) All the infrastructure facilities shall be provided by the owner at his own cost.
2) 40% contiguous land shall be kept open for play ground.
3) Minimum 12 m. wide approach road shall be provided.

**NOTE** :

A) The part plan showing the lands under the said modification bearing No.TPS- 1808 /371/CR 2085/2010/UD-13 is available for inspection of the general public during office hours on all working days at the following offices-
   1) Assistant Director of Town Planning, Pune, 283 Narayan Peth, Pune-411030
   2) The Collector, Pune.
B) This notification is also published on Government web site at www.urban.maharashtra.gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra,

( Sunil Marâlé )
Under Secretary to Government.